कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावताना कोव्हिडमुळे मृत्यू होणा-या कर्मचा-यांना विमा कवच/सानुग्रह सहाय्य लागू करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२०/प्र.क्र. ४/व्यय-९
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: २९ मे, २०२०.

संदर्भ : केंद्र शासनाच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाचे आदेश दि. २८.०३.२०२०.

शासन निर्णय-

कोरोनाच्या सार्वत्रिक साथीमध्ये सर्वेक्षण, शोध, माग काढणे, प्रतिबंध, चाचणी, उपचार व मदत कार्य यांचेशी संबंधित कर्तव्य बजावित असताना शासनाच्या विविध विभागातील विविध प्रवर्गातील कर्मचारी यांचा कोरोना विषाणूशी जवळून संबंध येत आहे. अशा कर्मचा-यांची काळजी घेण्यासाठी शासन कटिबध्द असून या असुरक्षित परिस्थितीत त्यांच्या मागे ठामपणे उभे राहण्याचा शासनाचा निर्धार आहे.

२. केंद्र शासनाच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाने त्यांच्या दि. २८.३.२०२० च्या आदेशानुसार यासंबंधी आरोग्य कर्मचारी यांचेसाठी विमा कवच योजना लागू केली आहे.

३. तथापि, आरोग्य सेवा संबंधित कर्मचा-यांव्यतिरिक्त अन्य कर्मचारी (जिल्हा प्रशासन, पोलीस, होमगार्ड, आंगणवाडी कर्मचारी, लेखा व कोषागारे, अन्न व नागरी पुरवठा, पाणी पुरवठा व स्वच्छता, घरोघरी सर्वेक्षणासाठी नेमलेले अन्य विभागांचे कर्मचारी इत्यादी) मोठ्या प्रमाणात कोव्हिड संबंधित कर्तव्ये पार पाडीत आहेत. कोव्हिड-१९ च्या सार्वत्रिक साथीशी लढा देणासाठी सक्रीय राहून कर्तव्य बजावणा-या अशा कर्मचा-यांना पाठबळ देण्याच्या दृष्टीकोनातून व अशा कर्मचा-यांचा दुर्दैवाने मृत्यू झाल्यास त्यांचे कुटुंबियांच्या पाठीशी उभे राहण्यासाठी शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतले आहेत.

अ) कोव्हिड विषाणूच्या सार्वत्रिक साथीच्या अनुषंगाने सर्वेक्षण, शोध, माग काढणे, प्रतिबंध, चाचणी, उपचार व मदत कार्य या कार्यवाहीशी संबंधित कर्तव्यावर कार्यरत सर्व कर्मचा-यांना रू. ५० लक्ष रकमेचे सर्वंकष वैयक्तिक अपघात विमा कवच पुरविण्यात येईल. या बाबतची कार्यपध्दती विमा कंपन्यांशी विचार विनिमय करून अंतिम करण्यात येत आहे.

ब) सदर विमा पॅकेज अंतिम होऊन कार्यान्वित होईपर्यंत अंतरिम उपाययोजना म्हणून कोव्हिड विषयक कर्तव्यावरील (सर्वेक्षण, शोध, माग काढणे, प्रतिबंध, चाचणी, उपचार, मदत कार्य इत्यादी) कर्मचा-यांच्या मृत्यूच्या सर्व प्रकरणी रू. ५० लक्ष रकमेचे सानुग्रह सहाय्य खालील अटींच्या अधीन प्रदान करण्यात येईल.

(१) सदर कर्मचारी त्याच्या इस्पितळात दाखल होण्याच्या अथवा मृत्यूच्या दिनांकांपूर्वी १४ दिवसांच्या काळात कर्तव्यावर हजर असला पाहिजे. ही बाब जिल्हाधिकारी अथवा अन्य कोणताही पदनिर्देशित विभाग प्रमुख इत्यादी यांचेकडून सत्यापित प्रमाणित करण्यात येईल.

(२) सदर मृत्यू कोव्हिड-१९ शी संबंधित असल्याबाबतचे वैद्यकीय प्रमाणन, शासकीय/ पालिका/महानगरपालिका, आय.सी.एम.आर नोंदणीकृत खाजगी इस्पितळ/प्रयोगशाळा यांचेकडून प्राप्त अहवालाच्या आधारे करण्यात येईल.

(३) “कर्मचारी” यांमध्ये सर्व कंत्राटी/ बाह्यस्त्रोतांद्वारे घेतलेले/ रोजंदारी/ तदर्थ/ मानसेवी कर्मचा-यांचा समावेश असेल.

(४) प्रस्तुत खर्चासाठी अर्थसंकल्पीय लेखाशीर्ष संबंधित मंत्रालयीन विभागांकडून सुचित करण्यात येईल.

(५) या योजनेसारखीच सानुग्रह सहाय्याची योजना सर्व स्थानिक स्वराज्य संस्था व राज्य शासकीय सार्वजनिक उपक्रम यांचेकडून राबविण्यात येईल.

क) वरील “अ” व “ब” येथील तरतुदी, केंद्र शासनाच्या संदर्भाधीन २८.३.२०२० च्या आदेशातील योजना लागू असणा-या कर्मचा-यांना व शासनाच्या योजनेत सुधारणा होऊन ज्या प्रकारच्या कोणत्याही कर्मचा-यांच्या समावेश होईल, अशा कर्मचा-यांना लागू होणार नाहीत.

४. सदर आदेश दि. ३०, सप्टेंबर,२०२० पर्यंत लागू राहतील.

५. सदर शासन निर्णयाचे अधिकारिक इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२००५२९१५११४१३८०५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Manoj Saunik

Digitally signed by Manoj Saunik
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f25a53a24b8d29e40821466854d96b314a8f72e7aed285522fcb6722abee3e2b, serialNumber=446051267064f6e7a79a97ad1d4d1a909ec8dc2504daa67ce24795e4626ad8ee, cn=Manoj Saunik
Date: 2020.05.29 16:08:06 +05'30'

**(मनोज सौनिक)**
**अपर मुख्य सचिव (वित्त)**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे प्रधान सचिव
२) मा. मुख्यमंत्रयांचे प्रधान सचिव
३) मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधान सभा, महाराष्ट्र विधानमडळ सचिवालय, मुंबई.
४) सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
५) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) मा. मुख्य सचिव, सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) सचिव, महाराष्ट्र विधानसभा/विधान परिषद विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
८) विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली ११०००१
९) प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
१०) प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
११) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१३) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१५) सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) निवड नस्ती, व्यय-९, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

**Regarding Insurance Cover/Ex-gratia assistance to employees in case of death on account of Covid during course of Covid related duties.**

**Government of Maharashtra**
**Finance Department**
**Govt. Resolution No: Misc. 2020/C.R. 4/Exp-9**
Madam Cama Road, Hutatma Rajguru Chowk,
Mantralaya,Mumbai 400032
Dated - 29th May, 2020

**Reference:**

1) Ministry of Health and Family Welfare Order dated 28.03.2020

**Government Resolution:**

Different categories of Government employees in various departments are getting exposed to the Coronavirus in performance of their duties relating to survey, tracing, tracking, prevention, testing, treatment and relief activities for Corona pandemic. State Government is committed to the welfare of such personnel and intends to standby them in such vulnerable situations.

2. In this regard Ministry of Health and Family Welfare, Government of India vide order dated 28.3.2020 has provided an insurance scheme for health workers and healthcare related staff.

3. However, besides healthcare staff a lot of other staff (District administration, Police, Home guards, Anganwadi workers, Finance and Treasury, Food and Civil supply, Water supply and Sanitation, Employees of various departments deputed for house to house survey work etc.) have also been involved in Covid related duties. Therefore, with a view to supporting such personnel in their active line of duty in fighting Covid-19 pandemic and to stand by their families in the event of their unfortunate loss of life, the State Government has taken the following decisions.

A. The government will provide a comprehensive personal accident cover of Rs 50 lakhs to all employees who are on active duty relating to survey, tracing, tracking, testing, prevention, treatment and relief activities for Covid pandemic. The modalities in this regard are being worked out with insurance companies.

B. Till the time such package is worked out and the insurance scheme comes into force, as an interim measure, all cases of deaths of the employees on duties (survey, tracing, tracking, prevention, testing, treatment, relief activities etc.), on account of Covid, will be covered through an ex-gratia assistance of Rs 50 lakhs subject to following conditions:

   a. The employee should have been on duty within the 14-day period preceding his/her hospitalization or death. The verification/certification in this regard would be done by District Magistrates or any other designated Head of Departments etc.

b. The medical certification that death is related to Covid-19, would be done on the basis of report of Government/Municipal/ICMR notified Private Hospital /Laboratory.
c. Employees would include all contractual/outsourced/daily wages/ad-hoc/ honorarium-based staff also.
d. The budget heads in this regard would be notified by the concerned departments
e. Similar ex-gratia assistance scheme will also be implemented by all Local Bodies and State Govt. Public Undertakings.

C. Provisions of A) and B) will not be applicable to the employees who have been covered under GOI scheme dated 28.3.2020 (Ref. 1) or any other category of employees included by amending that scheme.

4. These orders will be applicable till 30th September 2020.

5. This Government resolution of Maharashtra Government is available at the website www.maharashtra.gov.in. Reference no. for this is 202005291511413805. This order has been signed digitally.

By order and in the name of the Governor of Maharashtra.

Manoj
Saunik

Digitally signed by Manoj Saunik
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f25a53a24b8d29e40821466854d96b314a8f72e7aed285522fcb6722abee3e2b, serialNumber=446051267064f6e7a79a97ad1d4d1a909ec8dc2504daa67ce24795e4626ad8ee, cn=Manoj Saunik
Date: 2020.05.29 16:09:22 +05'30'

**(MANOJ SAUNIK)**
**ADDITIONAL CHIEF SECRETRAY (Finance)**